भायखळा जिल्हा कारागृह येथील विद्युत डी.पी.चा भार वाढविणेसंदर्भात येणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र. जेएलएम-०२१८/प्र.क्र.२१/तुरुंग-२,**

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ११ डिसेंबर, २०१८.

**वाचा:**

अपर पोलीस महासंचालक, कारागृह महानिरीक्षक व सुधारसेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.बीएलडी/भा.जि.का./विद्युत डी.पी./बसविणे/९३७/२०१७/कक्ष-६ (३) पुणे-१, दिनांक २५.१.२०१८.

**प्रस्तावना:**

भायखळा जिल्हा कारागृह येथे प्रशासकीय इमारतीच्या दुसऱ्या मजल्यावरील शासकीय विश्रामगृहाचे काम अंतिम टप्प्यात असून, सदर विश्रामगृहामध्ये नवीन विद्युतीकरण व वातानुकुलीत यंत्रणा बसविण्यात आली असल्याने अस्तित्वात असलेल्या विद्युत मीटरवर अतिरिक्त भार वाढल्याने शॉर्टसर्कीट होत आहे. त्यामुळे अस्तित्वात असलेली कमी विद्युत भाराची डी.पी. बदलून त्या ठिकाणी जास्तीचे भार (Capacity) असलेली नवीन डी.पी. बसविण्याबाबत कारागृह विभागाकडून भायखळा जिल्हा कारागृह येथील विद्युत डी.पी. चा विद्युतभार वाढविण्याबाबतचा रु.१८,८४,४८६/- (रुपये अठरा लाख चौ-याऐंशी हजार चारशे शहाऐंशी फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देऊन निधी मंजूर करणेबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

सदर प्रस्तावास सार्वजनिक बांधकाम विभागाने छाननीअंती परिगणित करुन रु.१८,७६,७२१/-(रुपये अठरा लाख शहात्तर हजार सातशे एकवीस फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे. त्यास अनुसरुन याद्वारे शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:**

भायखळा जिल्हा कारागृह येथील विद्युत डी.पी.चा विद्युतभार वाढविण्याबाबत रु.१८,७६,७२१/- (रुपये अठरा लाख शहात्तर हजार सातशे एकविस फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. एच-८, ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, १०१, बांधकाम, (००)(०) तुरुंग योजनांतर्गत योजना या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणा-या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक-३, नियम १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेले अधिकार व सार्वजनिक बांधकाम विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४२४/१८/इमा-२, दिनांक ५.९.२०१८ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक २९४/२०१८/व्यय-८, दिनांक ११.१०.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२११११५१९४३८३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth Vidyadhar Dhandore

Digitally signed by Siddharth Vidyadhar Dhandore
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=18c12c8352414c8a8937fd0998c9ca8d81b7ea489acfd971bb6de950e8d1d54f, serialNumber=5d16166df09e111cba9c7d5e4e321b340111df7b21c5b0fff0be638e80ea9a1b, cn=Siddharth Vidyadhar Dhandore
Date: 2018.12.11 15:23:33 +05'30'

**( सि. वि. धांडोरे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) पोलीस महासंचालक (कारागृह), महाराष्ट्र राज्य,मुंबई,
३) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक,कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४) विशेष पोलीस महानिरिक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) विशेष पोलीस महानिरिक्षक, दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई,
६) कारागृह उपमहानिरिक्षक, दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई,
७) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
८) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर,
९) लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई,
१०) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
११) कार्यासन अधिकारी (अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) कार्यासन अधिकारी (व्यय-८/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) निवडनस्ती (तुरुंग २), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

****************